**आदिवासी क्षेत्र उपयोजना/आदिवासीक्षेत्राबाहेरील उपयोजना**
**जून,२००९ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आलेल्या "शालेय शिक्षण" उपशिर्षाखालील योजनांतर्गत राज्यस्तरीय तरतूदीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.२/का.६**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :-२२ फेब्रुवारी,२०१०.**

**वाचा :** १. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-१०.०९/सीआर ९०/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च, २००९
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र.पूरक - १०.०९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३, दि.३० जून, २००९
३.आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बियुडी-२००९/प्र.क्र./१९४/का-६, २० नोव्हेंबर,२००९

**शासन निर्णय :-** आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून सदर तरतूद खर्च करण्यास मंजूरी देत आहे. त्यांनी या तरतूदी कॅश फ्लो प्रमाणे खर्च कराव्यात.

२. अंमलबजावणी अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. अंमलबजावणी अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व अंमलबजावणी अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे आदिवासी उपयोजना क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आदिवासी विकास, आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५.	अंमलबजावणी अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००२२२१९५२४६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

22/02/10

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**
सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा युवक विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)**
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.(प्रत्येकी ३ प्रती)
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
**सर्व अधिकारी / कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्राचलय, मुंबई**
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई
निवड नस्ती (का-६)

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतुदीचे वाटप

| **शिर्ष :** सामान्यशिक्षण<br>**योजनेचे नाव :-**अशासकीय कनिष्ट महाविद्यालयाला सहायक अनुदाने<br>(राज्यस्तर)<br>**(रुपये हजारात)** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २२०२- सर्वसाधारण शिक्षण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-माध्यमिक शिक्षण-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०४) अशासकीय कनिष्ट महाविद्यालयाला सहायक अनुदाने.<br>(२२०२ १९४८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतन) |
|---|---|

| जिल्हयाचे नाव | २००९-१० साठी केलेली तरतुद | २००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **एकुण** | **१२४८** | सचिव शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय, मुंबई. | . |

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतुदीचे वाटप

| **शिर्ष :** सामान्यशिक्षण<br>**योजनेचे नाव :-**अशासकीय माध्यमीक शाळांना सहायक अनुदाने<br>(राज्यस्तर)<br>**(रुपये हजारात)** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २२०२- सर्वसाधारण शिक्षण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-माध्यमिक शिक्षण-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०६) अशासकीय माध्यमीक शाळांना सहायक अनुदाने. (२२०२ ३५८४) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ३५, सहायक अनुदाने (वेतन) |
|---|---|

| जिल्हयाचे नाव | २००९-१० साठी केलेली तरतुद | २००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)** | ३३३३ | सचिव शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय, मुंबचई. | . |
| **३५ सहायक अनुदाने (वेतन)** | २००९२ | | | |
| ------------ | ------------ | | | |
| **एकुण** | २३४२५ | | | |